**सन २०२५-२६ करीता चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२५/प्र.क्र.४८/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५
२. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३८/६७/२०२५-२६, दिनांक २५.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता चिचपल्ली (ता.जि.चंद्रपूर) येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या लेखाशिर्षांतर्गत रु.१०००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास सन २०२५-२६ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६०% च्या मर्यादेत तसेच १) आमदार स्थानिक कार्यक्रम निधी २) जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण/अनुसूचित जाती घटक कार्यक्रम/आदिवासी घटक कार्यक्रम) यासाठी प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर) ६० टक्केच्या मर्यादेत आणि परिच्छेद क्र.२ अ) नुसार केंद्र पुरस्कृत योजनेतील केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा १००% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच सदर मासिक विवरणपत्रानुसार निधी एप्रिल ते डिसेंबर, २०२५ या कालावधीमध्ये पुढे / मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) देण्यात आली आहे. निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविण्यात आलेल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात, अशा सुचना देण्यात आल्या आहेत. तसेच सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद केलेल्या उद्दीष्टाकरीता प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी याबाबतचे प्रस्ताव ठोस समर्थनासह आवश्यकतेनुसार नियोजन विभागामार्फत वित्त विभागास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

सदर (४४१५-०१९२) योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.२ च्या

पत्रान्वये ०१-वेतन अंतर्गत रु.६०.०० लक्ष इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून त्यास अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. सदर प्रस्तावासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील नमुद क्र.२ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ च्या परिपत्रकानुसार बीम्स प्रणालीवर उपलब्ध निधी विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली स्थित चंद्रपूर येथील कर्मचाऱ्यांचा वेतनावरील खर्च भागविण्याकरीता बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या योजनेमधून ०१-वेतन अंतर्गत रु.१०.२० लक्ष इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
६. सदर आर्थिक वर्ष २०२५-२६ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०७.०४.२०२५ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजना अंतर्गत योजना, (००४) संशोधन (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ७.४.२०२५ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२९१४५४५४३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAV ASHOK BANTEWAD

Digitally signed by MADHAV ASHOK BANTEWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0d181aa39b4d21e44d471606b7df670cbc65b3cb8d80b1ca27929265161d139a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1B720BC879C4DDAC69D0E7FC911BFC2A93205010890D544AFB10419754DA2525, cn=MADHAV ASHOK BANTEWAD
Date: 2025.04.29 14:57:18 +05'30'

**( माधव अ. बंटेवाड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) तथा पदसिध्द संचालक वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर
४. संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
६. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली, चंद्रपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)